**विधानमंडळ प्राथम्य / समयमर्यादा**

भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचा सन २००६-०७ चा "स्थानिक संस्था" अहवाल

"क्षमता बांधणी"- कर्मचा-यांना संगणक प्रशिक्षण

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
शासन परिपत्रक क्रमांक :- भानिम-२०१०/प्र.क्र.२३/आस्था-९
दिनांक :- २६ जुलै, २०१०.

## परिपत्रक

भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचा सन २००६-०७ या वर्षाचा "स्थानिक संस्था"अहवाल महाराष्ट्र विधानमंडळाच्या नागपूर येथील सन २००९ च्या चौथ्या (हिवाळी ) अधिवेशनात दोन्ही सभागृहांना दिनांक २३ डिसेंबर, २००९ रोजी सादर करण्यात आला आहे.

२. सदर अहवालातील प्रकरण २, परिच्छेद-२.८ पृष्ठ क्रमांक-१८ वरील "क्षमता बांधणी" या शिर्षाखालील अहवालात असे नमूद करण्यात आले आहे की, माहिती तंत्रज्ञानाने सहाय्यभूत केलेले इ-गव्हर्नन्समध्ये, पंचायती राज संस्थांच्या कर्मचारी वृन्दाची क्षमता बांधणी हे एक उद्दिष्ट होते. त्याप्रमाणे, शासन अधिसूचना दिनांक २५ जानेवारी,१९९९ नुसार शासनाने नियम तयार केले. या नियमांत, अस्तित्वातले कर्मचारी आणि नवीन नेमणूका झालेल्या कर्मचा-यांना संगणकाचे ज्ञान प्राप्त करण्यासाठी दोन वर्षाची मुदत विहित केली होती. ही कालमर्यादा वेळोवेळी वाढविण्यात आली आणि अंतिमतः डिसेंबर २००७ पर्यंत वाढविली. महाराष्ट्राच्या दुस-या वित्त आयोगानी सुध्दा शिफारस केली होती की, पंचायती राज संस्थांच्या कर्मचा-यांना संगणकाचे ज्ञान अनिवार्य करावे. मार्च,२००८ अखेर चाचणी तपासणी केलेल्या जिल्हा परिषद वर्धा (५४.४१ %), यवतमाळ (४७.२८ %), परभणी (५८.७९ %), औरंगाबाद (४०.२९ %), नाशिक (८९.५६%), ठाणे (८७.०६ %), कोल्हापूर (६७.६१ %) या सात जिल्हा परिषदांतील प्रशिक्षित न झालेल्या कर्मचा-यांची टक्केवारी फार उच्च आढळून आली. पंचायती राज संस्थांना ई गव्हर्नन्स धोरणाची सुरुवात करुन ८ वर्षे उलटल्यावरही असे स्पष्ट होते की, जिल्हा परिषदेतील अप्रशिक्षित कर्मचा-यांच्या संख्येची टक्केवारी फार उच्च आहे. तसेच असेही दिसून आले की, ठाणे आणि नाशिक मधील अप्रशिक्षित कर्मचा-यांच्या संख्येची टक्केवारी ८० च्या वर आहे. ते ई-गव्हर्नन्स च्या अंमलबजावणीसाठी आवश्यक आहे आणि आणि जिल्हा परिषदेने नियोजन करायला हवे होते.

३. भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांनी त्यांच्या अहवालात नोंदविलेले उपरोक्त अभिप्राय गंभीर स्वरुपाचे असून त्याची नोंद घेवून याबाबत शासन असे आदेश देत आहे की, ई-गव्हर्नन्सच्या उद्दीष्टपुर्ततेसाठी कर्मचा-यांना संगणक प्रशिक्षण आवश्यक आहे. संगणक

प्रशिक्षणाबाबत सामान्य प्रशासन विभागाने याबाबत केलेले नियम व वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेऊन जिल्हा परिषदांमधील प्रशिक्षण न झालेल्या अप्रशिक्षित कर्मचा-यांचे संगणक प्रशिक्षण पुर्ण करण्याबाबतची कार्यवाही जिल्हा परिषदाच्या मुख्य कार्यकारी अधिका-यांनी त्वरेने पुर्ण करण्याची दक्षता घ्यावी. तसेच सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये जिल्हा परिषदेकडील कर्मचा-यांना संगणक प्रशिक्षण दिलेल्या कर्मचा-यांची माहिती भरुन दर तीन महिन्याने संबंधीत विभागीय आयुक्त यांचेकडे पाठवावी. पहिला तिमाही माहितीचा अहवाल १ जुलै,२०१० ते ३० सप्टेंबर,२०१० या कालावधीचा असेल. तद्नंतर पुढील प्रत्येक तिमाही अहवाल देण्यात यावा. याबाबत विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हा परिषदांचा नियतकालीक आढावा घेऊन कर्मचा-यांना संगणक प्रशिक्षणासाठी पाठविण्यात येऊन त्यांची क्षमता बांधणी हे उद्दीष्ट पूर्ण करण्यासाठी पर्यवेक्षण करावे.

५. संगणक प्रशिक्षणासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाचे नियम व वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले शासन आदेश जिल्हा परिषदांना जसेच्या तसे योग्य त्या फेरफारासह यापूर्वी प्रमाणेच लागू राहतील.

६. सदर शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००७२२१९२९२७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

( प्रकाश हिर्लेकर )
सह सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मंत्री, ग्राम विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांचे स्वीय सहायक.
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व उपआयुक्त,(आस्थापना) / उपआयुक्त (विकास शाखा), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी,(सामान्य )
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व सह सचिव / उप सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
निवड नस्ती ( आस्था-९), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२